सन २०२३-२४ या वर्षाकरीता वाईन उद्योगास प्रोत्साहन या योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- वाप्रयो२०२४/ प्र.क्र.५९/ उद्योग-२**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २८ मार्च, २०२४

**संदर्भ** :-

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८ / २००९/ उद्योग- २, दिनांक ३१/०८/ २००९.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन परिपत्रक क्र. डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८ / २००९ / उद्योग- २, दिनांक ०१/०२/ २०१०.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्रमांक डब्ल्यूआयपी २००९ / प्र.क्र.३२८/ उद्योग- २, दिनांक २१/०८/२०१०.

४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र. वाप्रोअ-१७१४/प्र. क्र. ३/ उद्योग-२, दिनांक २७/१०/२०१४.

५) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान-२०२४/ अे-१७०, दि.०९/०२/२०२४

६) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ वाईन प्रोत्साहन अनुदान-२०२४/ अे-३४१, दि.२२/०३/२०२४

७) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभागाचा शासन निर्णय क्र. वाप्रयो २०२०/प्र.क्र ६६/उद्योग-२, दिनांक २१/०२/२०२४

८) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभागाचा शासन निर्णय क्र. वाप्रयो २०२३/प्र.क्र ८७/उद्योग-२, दिनांक २२/०३/२०२४

९) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभागाचे दिनांक २७/०३/२०२४ चे पुनर्विनियोजन ज्ञापन.

१०) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभागाचा शासन निर्णय क्र. वाप्रयो २०२४/प्र.क्र ५९/उद्योग-२, दिनांक २८/०३/२०२४

**शासन निर्णय :-**

राज्यातील द्राक्ष उत्पादक शेतक-यांचे नुकसान होऊ नये, शेतक-यांना द्राक्ष लागवडीस प्रोत्साहन देणे, सुकामेवा बनविणे तसेच द्राक्षापासून आर्थिकदृष्ट्या अधिक लाभदायी पर्यायी उत्पादनांची निर्मिती व्हावी तसेच द्राक्षावर आधारीत वाईन उद्योगास प्रोत्साहन म्हणून शासनाने द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण-२००१, दि.१९/१०/२००१ च्या शासन निर्णयान्वये घोषित केले. सदर धोरणाच्या अंमलबजावणीचा भाग म्हणून राज्यामध्ये उत्पादीत केलेल्या व अंतिमत: विक्री झालेल्या वाईनच्या विक्रीवर देय असलेल्या २० टक्के मुल्यवर्धीत कर भरल्यास त्यापैकी १६ टक्के कराच्या रकमेइतके वाईन प्रोत्साहन अनुदान वाईन उद्योगास देण्याबाबत ची योजना शासनाने दि.३१/०८/२००९ च्या शासन निर्णयान्वये अमलात आणली आहे. मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ०१/०४/२०२४ व दिनांक ०४/०२/२०२४ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार वाईन उत्पादक घटकास प्रोत्साहन योजनेअंतर्गत प्रलंबित दावे निकाली काढणे व सदर योजनेची

अंमलबजावणी पुढे सुरु ठेवण्याबाबत संदर्भाधीन क्र. ७ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी राज्यकर सह आयुक्त (व्हॅट व्यवस्थापन) नाशिक विभाग नाशिक, राज्यकर सह आयुक्त मोठे करदाते कक्ष-३ मुंबई, राज्यकर सह आयुक्त पुणे विभाग पुणे, राज्यकर सह आयुक्त (व्हॅट व्यवस्थापन) सोलापूर विभाग सोलापूर यांचेकडून प्रोत्साहन परताव्याबाबत प्राप्त प्रस्ताव व उद्योग संचालनालयामार्फत उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. ०५ व ०६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर शिल्लक निधी विचारात घेता एकूण ४ वाईन उत्पादक घटकास प्रोत्साहन या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

२. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता वित्त विभागामार्फत सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत एकूण रु. १५ कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिल्यानुसार संदर्भाधीन क्रमांक ८ नुसार दिनांक २२/०३/२०२४ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. वित्त विभागाने पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या रु.१०० कोटी इतक्या निधीच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १० अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर योजनेकरीता अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी विचारात घेऊन, संदर्भ क्रमांक १ ते ४ येथे नमूद केलेले शासन निर्णय / परिपत्रक/ शुध्दीपत्रकातील तरतुदी, निकष, पात्रता इत्यादींची पडताळणी/शर्तीची काटेकोर अंमलबजावणी करण्याची खात्री करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून, उद्योग संचालनालयामार्फत प्राप्त संदर्भाधीन क्र. ५ व ६ मधील खालील चार दाव्यांना रु. २८,९७,६५६/- (रुपये अठ्ठावीस लाख सत्याण्णव हजार सहाशे छपन्न फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | घटकांचे नाव | कालावधी | दाव्याची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | विनस सेलर्स प्रा.लि.,नाशिक | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१९ | ८,४३,७९५ |
| २ | शिवप्रसाद वाईन,नाशिक | ०१/०४/२०१८ ते ३०/०९/२०१८ | ३४,४१२ |
| ३ | शिवप्रसाद वाईन,नाशिक | ०१/१०/२०१८ ते ३१/०३/२०१९ | ५६,५६६ |
| ४ | यॉर्क वाईनरी प्रा.लि.,नाशिक | ०१/०४/२०२१ ते ३०/०९/२०२१ | १९,६२,८८३ |
| | | **एकूण** | **२८,९७,६५६** |

३. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च, मागणी क्रमांक - के ७, लेखाशिर्ष २८५२ - उद्योग (००)(११) वाईन उद्योगास प्रोत्साहन (अनिवार्य) (२८५२ ०४७२), ३३ -अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वरील परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या एकूण रुपये प्राप्त रु. २८,९७,६५६/- (रुपये अठ्ठावीस लाख सत्याण्णव हजार सहाशे छपन्न फक्त) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणास वितरीत करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर धनादेश लेखाधिकारी, उद्योग संचालनालय यांचे नावे काढण्यात यावा व उद्योग संचालनालयाकडून सदर निधी महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण, मुंबई यांना अदा करण्यात यावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाने महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणाकडून प्राप्त करुन शासनास त्वरीत सादर करावे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९४/२०२४/व्यय-१६, दि.१२/०३/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने अर्थसंकल्पिय प्रणालीवर शिल्लक निधी नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२८१७२२३२९०१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNITA AJAY HAZARI

Digitally signed by SUNITA AJAY HAZARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=902bffd437652eee8f65932190c71d2b5cd1778714d082db09d1994383cce843, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E3B30CC02C8FF1BDF9FCDCD3B2536AF5C8ADFD05E9D409FAE0A032DDB4385717, cn=SUNITA AJAY HAZARI
Date: 2024.03.28 18:03:32 +05'30'

**( सुनिता हजारी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२. (५ जादा प्रतीसह)
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई -४०० ०१०.
८. राज्यकर सह आयुक्त, विक्रीकर भवन, नाशिक विभाग, पाथर्डी फाटा, नाशिक-४२२०१०.
९. राज्यकर सहआयुक्त (व्हॅट व्यवस्थापन) सोलापूर विभाग, विक्रीकर भवन, विजापूर रोड, सोलापूर.
१०. राज्यकर सह आयुक्त, मोठे करदाते कक्ष-३, वस्तू व सेवा करभवन, माझगाव, मुंबई
११. राज्यकर सह आयुक्त, पुणे विभाग, पुणे
१२. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई.
१३. संबंधित घटक नाशिक/ पुणे/ सोलापूर.
१४. कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय -४०० ०३२.
१५. निवड नस्ती, (उद्योग-२).